**Inductively Coupled Plasma Sectrophotometer-ICP या अत्याधुनिक उपकरणाच्या दुरुस्तीसाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१८/प्र.क्र.१३४/आरोग्य-८**
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रूग्णालय कंपांउंड,
कॉम्प्लेक्स बिल्डिंग, १० मजला, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १७ जानेवारी, २०१९.

वाचा:-

१. उपसंचालक, आरोग्य सेवा, राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे यांचे पत्र क्रमांक-उसंआसे/ रासाआप्र/भांडार-१२०/खर्च मंजूरी /३०३५-३७/२०१८दिनांक २.१.२०१८.
२. संचालक,आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक.संआसे/साथरोग कक्ष-६/ प्रयोगशाळा अत्याधुनिक उपकरण दुरुस्ती प्रस्ताव/४८६-८७/१८, दिनांक २०.६.२०१८.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा, राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे यांचे पत्र क्रमांक-उपसंआसे/ रासाआप्र/भांडार कक्ष/नस्ती-१२०/५९९१-९२/२०१८दिनांक ०५.१०.२०१८.

प्रस्तावना:-

Inductively Coupled Plasma Sectrophotometer-ICP या अत्याधुनिक उपकरणाच्या दुरुस्तीसाठी सुटे भाग खरेदीस उपरोक्त पत्रान्वये प्रस्ताव प्राप्त झाला असून सदर खरेदीसाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आरोग्य सेवा संचालनालयाने संदर्भीय दिनांक २०.०६.२०१८ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने शासन निर्णय क्र.राआप्र-११/प्र.क्र.२१७/आरोग्य सेवा-३ अ, दिनांक ३१.०८.२०१२ अन्वये आरोग्य विभागाच्या अखत्यारीतील प्रयोगशाळेत तपासणीसाठी येणा-या अन्न व पाणी नमुन्यातील तपासणीकरिता स्वीय प्रपंजी खात्यात जमा होणा-या रक्कमेपैकी २५ टक्के रक्कम वित्तीय अधिकार नियमावलीच्या तरतूदीच्या अधिन राहून प्रयोगशाळेसाठी आवश्यक

असणारी साधन सामुग्री यासाठी खर्च करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार महाराष्ट्र शासन, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भाखंस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-२/उद्योग-४, दि.१.१२.२०१६ मधील मुद्या क्र.३.२.६ नुसार एकलस्त्रोत तत्वावर Inductively Coupled Plasma Sectrophotometer-ICP या अत्याधुनिक उपकरणाच्या दुरुस्तीसाठी सुटे भाग खरेदीस रक्कम रु.५६,८२१/-(रु.छपन्न हजार आठशे एकवीस फक्त) सर्व करासहित राज्याच्या स्वीय प्रपंजी खात्यामधुन खर्च भागविण्यासाठी खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.-

१. सदर साहित्य सामुग्रींची आवश्यकता याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या दुरुस्ती करण्यात यावी. सदरहू साहित्य सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी.
२. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानूसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.
३. शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III /उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.
४. प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि

संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५. दुरुस्ती करण्यात येणाऱ्या बाबींची दुरुस्ती नंतर तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंची दुरुस्तीसाठी खरेदी करण्यात आली, याची खात्री करण्यात यावी.

६. दुरुस्तीसाठी खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता कार्यक्रम प्रमुखांनी घ्यावी.

७. केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

८. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता कार्यक्रम प्रमुख करतील.

**उपरोक्त अनुक्रमांक १ ते ८ येथे नमूद अटींची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुख यांची तसेच आरोग्य सेवा संचालनालयाची राहील**.

शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र.भाखंस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-२/उद्योग-४, दिनांक १.१२.२०१६ मधील मुद्दा क्र.३.२.६ नुसार एकलस्त्रोत तत्वावर Inductively Coupled Plasma Sectrophotometer-ICP या अत्याधुनिक उपकरणाच्या दुरुस्तीसाठी रक्कम रु. ५६,८२१/-(रु.छपन्न हजार आठशे एकवीस फक्त) सर्व करासहित राज्याच्या स्वीय

प्रपंजी खात्यामधून खर्च भागविण्यासाठी प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे-:

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११८१३२४३५६२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2019.01.18 16:10:05 +05'30'

**( ज.स.तडवी)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि. परेल, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-1 (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-2 (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११) निवडनस्ती (आरोग्य-८)